**उच्च व्यावसायिक व इयत्ता बारावीनंतरच्या सर्व अभ्यासक्रमामध्ये शिक्षण घेणाऱ्या राज्यातील गुणवत्ताधारक अल्पसंख्यांक विद्यार्थ्यांकरीता शिष्यवृत्ती योजनेंतर्गत पालकांची वार्षिक उत्पन्न मर्यादा रु. ६.०० लाखावरुन रु. ८.०० लाख करण्याबाबत**

**महाराष्ट्र शासन**
**अल्पसंख्यांक विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : अविवि-२०१८/प्र.क्र.१८३/का-६**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२
दिनांक : ०३ नोव्हेंबर, २०१८

संदर्भ :

१. अल्पसंख्यांक विकास विभाग, शासन निर्णय क्रमांक : अविवि २००९/प्र.क्र.४६/०९/ का.१, दिनांक ०५/०२/२००९
२. अल्पसंख्यांक विकास विभाग, शासन निर्णय क्रमांक : अविवि २०१०/प्र.क्र.२१२/०९/ का.४, दिनांक ०३/०२/२०१०
३. अल्पसंख्यांक विकास विभाग, शासन निर्णय क्रमांक : अविवि २०१०/प्र.क्र.११२/१०/ का.६, दिनांक २२/०७/२०१०
४. अल्पसंख्यांक विकास विभाग, शासन निर्णय क्रमांक : अविवि २०११/ प्र.क्र.४४/११/ का.६, दिनांक १४/१०/२०११
५. अल्पसंख्यांक विकास विभाग, शासन निर्णय क्रमांक : अविवि २०१४/प्र.क्र.००३/१४/ का.६, दिनांक २९/०७/२०१५
६. अल्पसंख्यांक विकास विभाग, अधिसूचना क्र. विकाक २०१५/प्र.क्र.१७७/का.९, दिनांक ०२/०७/२०१६

**प्रस्तावना :**

राज्य शासनाने अल्पसंख्यांक लोकसमूह म्हणून घोषित केलेल्या राज्यातील मुस्लीम, बौध्द, ख्रिश्चन, जैन, शीख, पारसी व ज्यू या समाजातील उच्च व्यावसायिक व इयत्ता १२ वी नंतर सर्व अभ्यासक्रमामध्ये शिक्षण घेणाऱ्या अल्पसंख्यांक विद्यार्थ्याकरीता शिष्यवृत्ती योजना संदर्भाधिन क्र. ४ येथील शासन निर्णयान्वये राबविण्यात येत आहे. सदर शासन निर्णयात नमूद करण्यात आल्यानुसार या शिष्यवृत्ती योजने अंतर्गत या योजनेचा लाभ घेण्यासाठी संबंधित अल्पसंख्यांक विद्यार्थ्यांच्या कुटूंबांच्या वार्षिक उत्पन्नाची मर्यादा रु. २.५० लाख इतकी विहित करण्यात आली होती. संदर्भ क्रमांक ५ येथील शासन निर्णयाद्वारे या उत्पन्नमर्यादेत रू. ०६.०० लाखपर्यंत वाढ करण्यात आलेली आहे. आजमितीस अल्पसंख्यांक विद्यार्थ्यांच्या कुटुंबाच्या वार्षिक उत्पन्नमर्यादेत वाढ करून ती रू. ०८.०० लाख करण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय :**

उच्च व्यावसायिक व इयत्ता १२ वी नंतर सर्व अभ्यासक्रमामध्ये शिक्षण घेणाऱ्या राज्यातील अल्पसंख्यांक विद्यार्थ्यांकरीता शिष्यवृत्ती योजनेंतर्गत संदर्भ क्र. ४ येथे नमूद शासन निर्णयातील अटी व शर्ती मधील अ.क्र.१० येथे नमूद करण्यात आलेली, अल्पसंख्यांक विद्यार्थ्यांच्या कुटुंबाची सर्व स्त्रोताव्दारे मिळणाऱ्या वार्षिक उत्पन्नाची मर्यादा रु. ०६.०० लाख यावरुन रु. ०८.०० लाख करण्यास या शासन निर्णयान्वये मंजूरी देण्यात येत आहे.

२. या योजनेच्या उर्वरीत सर्व अटी व शर्ती संदर्भ क्र.४ येथील दि.१४/१०/२०११ च्या शासन निर्णयात नमूद केल्यानुसार पूर्वीप्रमाणेच लागू राहतील.

३. सदरचा निर्णय हा आदेश निर्गमित केल्याच्या दिनांकापासून लागू होईल.

४. हा शासन निर्णय नियोजन आणि वित्त विभागाच्या सहमतीने वित्त विभागाचा अनौपचारिक संदर्भ क्रमांक २२०/२०१८/व्यय -१, दि. ०९/१०/२०१८ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१८११०३१०४७३१३४१४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने

Sandesh Chhabu Tadvi

Digitally signed by Sandesh Chhabu Tadvi
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Minorities Development Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=2fde30534317da1ea9bdb3e7bec3c1084d5d608a86e993f8ac0fa02331b77751, serialNumber=b469b3fd61b5201f03b702c0f7fd0ec5cf18beb12425455f4856f44e3d4da763, cn=Sandesh Chhabu Tadvi
Date: 2018.11.03 11:54:28 +05'30'

**( सं.छ.तडवी )**
सहसचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१) मा. राज्यपालांचे सचिव
२) मा. मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव
३) मा. मंत्री/राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव
४) मा. विरोधी पक्ष नेता विधानसभा/विधानपरिषद
५) मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन
६) अपर मुख्य सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय
७) अपर मुख्य सचिव, वित्त विभाग, मंत्रालय
८) अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव, सर्व मंत्रालयीन विभाग
९) सर्व मंत्रालयीन विभाग
१०) महालेखापाल १/२, महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर
११) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
१२) निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई
१३) सर्व विभागीय आयुक्त,
१४) सर्व जिल्हाधिकारी
१५) सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी
१६) संचालक, तंत्र शिक्षण संचालनालय, मुंबई
१७) संचालक, वैद्यकीय शिक्षण आणि संशोधन संचालनालय, मुंबई
१८) संचालक, शिक्षण संचालनालय (उच्च), पुणे
१९) आयुक्त ( पशुसंवर्धन), महाराष्ट्र राज्य, पुणे
२०) सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, विधान भवन, मुंबई
२१) महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय ( प्रसिध्दीसाठी)
२२) निवड नस्ती